**उच्च शिक्षण संचालनालयाच्या आस्थापनेवरील विभागीय सहसंचालक (उच्च शिक्षण) व सहसंचालक (प्रशासन) या पदांचा अतिरिक्त कार्यभार सोपविण्यासाठी उमेदवारांची पात्रता विहित करणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र.बैठक - २०२५/प्र.क्र.१३९/ई-१०८१६६३/मशि-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार इमारत, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ०६ मे, २०२५

वाचा :- शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र.संकीर्ण-२०२२/ प्र.क्र.२७५/ मशि-१, दि.०३ नोव्हेंबर, २०२२.

**प्रस्तावना :-**

उच्च शिक्षण संचालनालयाच्या आस्थापनेवरील विभागीय सहसंचालक (उच्च शिक्षण) व सहसंचालक (प्रशासन) या पदांचे सेवाप्रवेश नियम अंतिम होऊन सदर पदांवर महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत उमेदवारांची नियुक्ती करण्यास काही कालावधी लागण्याची शक्यता आहे. सदर बाब विचारात घेऊन संदर्भीय दि.०३ नोव्हेंबर, २०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये १० विभागीय सहसंचालक (उच्च शिक्षण) तसेच ०२ सहसंचालक (प्रशासन) या पदांचा अतिरिक्त कार्यभार सोपविण्यासाठी निवड समिती गठीत करण्यात आली असुन अतिरिक्त कार्यभाराने नियुक्तीसाठी शैक्षणिक पात्रता, अनुभव, अटी व शर्ती विहित करण्यात आल्या होत्या. संदर्भीय शासन निर्णयान्वये गठीत निवड समितीचा कार्यकाळ संपुष्टात आला आहे. सबब, विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण तसेच सहसंचालक (प्रशासन) या पदांचा अतिरिक्त कार्यभार सोपविणेसाठी सुयोग्य अधिकारी यांच्या निवडीकरीता अधिकतम पात्र उमेदवार उपलब्ध होणेसाठी उमेदवारांची पात्रता विहित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

प्रस्तावनेत नमुद केल्याप्रमाणे उच्च शिक्षण संचालनालयाच्या अधिनस्त १० विभागीय सहसंचालक (उच्च शिक्षण) तसेच ०२ सहसंचालक (प्रशासन) या पदांवरील अतिरिक्त कार्यभाराने नियुक्तीकरिता खालीलप्रमाणे शैक्षणिक पात्रता, अनुभव व वयोमर्यादा विहित करण्यात आहे:-

**i) विभागीय सहसंचालक (उच्च शिक्षण) :**

१) पदव्युत्तर पदवीमध्ये किमान ५५ टक्के गुण.

२) पी.एच.डी. पदवी.

३) प्राध्यापक / सहयोगी प्राध्यापक/ सहाय्यक प्राध्यापक (निवडश्रेणी/ AL-१२), ९ वर्षे शिकविण्याचा अनुभव.

{या अनुभवाबाबत स्पष्ट करण्यात येते की, प्राध्यापक / सहयोगी प्राध्यापक/ सहाय्यक प्राध्यापक (निवडश्रेणी / AL-१२) या पदावर/ वेतनश्रेणीत कार्यरत असणे आवश्यक आहे. तसेच एकुण ९ वर्षे पदवी / पदव्युत्तर महाविद्यालयामध्ये शिकविण्याचा अनुभव (Professor / Associate Professor with aggregate experience of not less than nine years in the field of teaching at degree / postgraduate degree colleges) असणे आवश्यक आहे.}

४) प्रशासकीय कामकाजाचा ३ वर्षाचा अनुभव.

५) पी.एच.डी. धारण केल्यानंतर किमान ३ प्रकाशने.

६) कमाल वयोमर्यादा ५५ वर्षे.

**ii) सहसंचालक (प्रशासन):**

१) वरिष्ठ प्रशासन अधिकारी, महाराष्ट्र शिक्षण सेवा, गट अ या संवर्गातील पदाचा किमान ३ वर्षाचा अनुभव.

२) प्रशासन अधिकारी, महाराष्ट्र शिक्षण सेवा, गट अ या संवर्गातील पदाचा किमान ६ वर्षाचा अनुभव.

२. **विभागीय सहसंचालक (उच्च शिक्षण) व सहसंचालक (प्रशासन) या पदावरील नियुक्तीचा कालावधी:**

विभागीय सहसंचालक (उच्च शिक्षण) व सहसंचालक या पदांवर देण्यात येणारी नियुक्ती ही केवळ तात्पुरत्या स्वरूपात असून, २ वर्षाकरिता किंवा महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून नियमित उमेदवार उपलब्ध होईपर्यंत किंवा इतर कोणत्याही कारणास्तव पुढील शासन आदेश होईपर्यंत यापैकी पैकी जे आधी घडेल तोपर्यंत राहील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन त्याचा संगणक संकेतांक २०२५०५०६११४५५४११०८ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ASHOK SHANKAR MANDE

Digitally signed by ASHOK SHANKAR MANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=fabb29d28cdbcbe5c9eed052cb38b8cb567068a0090e237f095c6e50a52a6cf5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D96FF33E8AF31F745D84F3411F94D896382FAA82659B10108672887A87D6FC7C, cn=ASHOK SHANKAR MANDE
Date: 2025.05.06 11:47:14 +05'30'

**(अशोक मांडे)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.

२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३. मा.उपमुख्यमंत्री (नगर विकास), यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
४. मा.उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
५. मा.मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
६. मा.राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
७. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरिक्षा), महाराष्ट्र राज्य-१/२, मुंबई/नागपूर
९. सर्व विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण.
१०. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
११. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे, नागपूर, छत्रपती संभाजीनगर.
१२. निवडनस्ती मशि-१.